# "कठोर चिकित्से"च्या मर्यादा

## वसंत पळशीकर

शिवरात्र - नरहर कुरुंदकर

साधना प्रकाशन, पुणे, १९७०

नरहर कुरुंदकर हे एक बेडर, वादग्रस्त व्यक्तिमत्त्व आहे त्यांच्याबद्दल सौम्य मत बाळगणे जवळपास कठीणच. त्यांची मते, सर्वच मते अधिकारवाणीने उच्चारलेली असतात. आपले अमूक एक मत तसे का बनले याविषयीचे त्यांचे विवेचनदेखील अशा पद्धतीचे असते की, याखेरीज अन्य काही भूमिका, कार्यकारणमीमांसा असू शकते असे त्यांना चुकूनही वाटत नसावे. हा आत्मविश्वास आणि त्यामुळे सवयीची झालेली विचारपद्धती यांमुळे कुरुंदकरांना काही काही वेळा फार धोक्यात. आणले आहे. प्रा. मे. पुं. रेगे यांचे त्यांच्या ' रूपवेध' पुस्तकावर 'सत्यकथा' मासिकातील परीक्षण ज्यांनी वाचले असेल त्यांना हे कळावे. प्रस्तुत संग्रहातील 'मौ. आझाद : एक स्मरण’ या लेखांचा प्रा. रेगे यांनी 'नवभारत' मासिकातून घेतलेला परामर्शही त्यांच्या लेखनातील या स्वभाववैशिष्ट्यातून व विचारपद्धतीतून निर्माण होणाऱ्या गंभीर त्रुटी उघड करतो.

आणि तरीही कुरुंदकरांच्या लेखनाकडे आपण दुर्लक्ष करू शकत नाही. कारण अशा प्रकारच्या त्रुटींनी ढिसाळ बनलेले लेखन वजा केल्यावरही बरेच काही महत्त्वाचे शिल्लक राहते. म्हटले तर ही आश्चर्य करावे अशी गोष्ट आहे. पण कुरुंदकरांच्या वैचारिक व्यक्तिमत्वाची जडणघडण लक्षात घतल्यास हे आश्चर्य उरत नाही. जगत असताना मनाला येऊन भिडलेल्या प्रश्नांचा आपल्या सर्व कुवतीनुसार, स्वतःच्या निष्ठांशी प्रामाणिक राहून, टोकापर्यंत जाऊन विचार करून काही भूमिका बनवणे व ती बेडरपणे मांडणे हा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा विशेष हा आहे. ते साक्षेपी पंडित नाहीत. एकदा त्यांच्या या वैचारिक व्यक्तिमत्वाची ही जातकुळी लक्षात घेतली की कुरुंदकरांचे लेखन वाचताना त्यातील या प्रकारची दोषस्थळे पहाण्याचे वैय्यर्थ्य लक्षात येते. आणि आपले लक्ष त्यांना काय सांगायचे आहे यावर केंद्रित होते.

आझादांवरील लेखाचा चिकित्सक परामर्श प्रा. रेगे यांनी घेतला आहे. आणि त्या अंगाने त्याची चिकित्सा अधिक चांगली केली जाऊ शकत नाही. पण मूळ लेख व प्रा. रेगे यांचे त्यावरील भाष्य दोन्हीही मौ. आझादांच्या शोकात्म जीवनाचे रहस्य समाधानकारकपणे उकलून दाखवीत नाहीत की त्यांना पूर्ण न्याय देत नाहीत. रेग्यांच्या टीकेतून, मौलानांचे कुराणभाष्य व त्यातून त्यांची बनलेली 'उम्मतुलवाहिदा'ची (सर्वधर्मीय राज्यसत्तेची) भूमिका ही नवपरंपरावादीच होती हे स्पष्ट होते. आणि या टीकेची भर कुरुंदकरांच्या व्यवहारातल्या तडजोडीवादी भूमिकेवरील टीकेत पडून एकंदर मौलानांविषयीचे मत अधिक वाईटच बनते. पण यात मौलानांवर घोर अन्याय होतो यात शंका नाही. कारण, परिस्थिती, इतर शक्तिप्रवाह आणि काँग्रेसमधील इतर नेत्यांची व्यक्तिमत्वे या घटकांचा विचार टाळून केलेले हे मूल्यमापन ठरते. ‘अच्युतराव पटवर्धनांच्या सहवासातील एक दिवस' हा लेख १९७१ च्या लोकसभेच्या मध्यावधी निवडणुकांनंतर समाजवाद्यांच्या दृष्टीने एकाएकी अत्यंत महत्त्वपूर्ण ठरतो. कारण परत एकदा

समाजवाद्यांच्या पुढे तीच, १९५२ च्या पराभवानंतरच्या सारखीची आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली आहे. केंद्र सरकारात सत्तास्थानी आपण आलोच या नशेत निवडणूक लढविलेल्या संयुक्त समाजवाद्यांना विशेषतः उत्तरेतील जनतेने टांग मारून धुळीत लोळवले आहे. काँग्रेसमधून बाहेर पडावे, पण स्वतःच्या शक्तीविषयी भ्रम न बाळगता शिस्तबद्ध संघटना बांधण्याच्या कामात काही वर्षे गाडून घ्यावे या मताचे अच्युतराव अल्पमतात गेले व त्यातून त्यांनी राजीनामा सादर केला.

सरकार बनविता यावे म्हणून 'मिळेल तो माणूस समाजवादी पक्षात दाखल करून घेणे आणि संघटनेला दर्शनी भव्य रूप देणे हा उद्योग करण्यातच आमचे कार्यकर्ते गढलेले होते.' हे वाचत असताना आपण आजच्या संयुक्त समाजवाद्यांबद्दलच (उत्तर प्रदेश, बिहारकडील विशेषतः) वाचत आहोत असे वाटते. अच्युतराव पटवर्धनांचे पुढील वाक्य समाजवाद्यांनी आज त्यावर कृती करावी असे आहे : 'समाजवादी पक्ष, प्रजासमाजवादी पक्ष या संघटना एकदा विसर्जित करून टाकाव्यात आणि नव्याने ध्येयवादी शंभर कार्यकर्ते घेऊन पुन्हा एकदा पक्षाची मांडणी करावी.' कुरुंदकरांनी अच्युतराव पटवर्धनांशी झालेल्या गप्पागोष्टींतील इतरही भाग दिला आहे. त्यातील मानवी मनाच्या चिवट परंपरावादी वैशिष्ट्यांचे व त्यापासून घ्यावयाच्या बोधाचे विवेचनही मननीय आहे. सूक्ष्म विश्लेषक बुद्धीची देणगी असलेल्या, राजकारणात अनेक वर्षे कार्य केलेल्या ज्येष्ठ व्यक्तीचे चिंतन उपलब्ध करून दिल्याबद्दल कुरुंदकरांचे आभार मानले पाहिजेत.

'गांधीहत्या आणि मी' हे गोपाळ गोडसे यांचे पुस्तक एका वाचकवर्गात फार प्रिय ठरले. या वाचकांमध्ये मराठीतील अनेक नामवंत व्यक्तींचा समावेश असावा ही एक मोठी आश्चर्याची घटना होती. या पुस्तकाचे अत्यंत मार्मिक परीक्षण कुरुंदकरांनी केले होते. त्याचा समावेश या संग्रहात केला आहे. श्री गोपाळ गोडसे यांचे पुस्तक अप्रामाणिक आहे, ऐतिहासिक सत्य सांगण्याचा दावा करून ते स्वतःची भावविवश कैफियत सादर करते (आणि कटासंबंधी धोरणी मौन पाळते), पण त्याहून अधिक म्हणजे ते एक खोडसाळ बुद्धीने व एक दूरगामी राजकीय हेतू मनात बाळगून लिहिलेले पुस्तक आहे. ही खोडसाळ बुद्धी कुरुंदकरांनी उघड केली आहे, पण दूरगामी राजकीय हेतूची चिकित्सा केलेली नाही. ज्या अविवेकी राजकीय विचारपरंपरेचा, कार्यपद्धतीचा, मूल्यांचा गांधीखून हा एक तर्कसंगत परिणाम होता त्या विचारपरंपरेला व मूल्यांना सोज्वळ प्रतिष्ठा प्राप्त करून देणे व याद्वारे परत एकवार त्या विचारपरंपरेला कार्याचा रस्ता खुला करून देणे हा तो हेतू होय. सौ. सिंधू गोडसे यांच्या एकनिष्ठेचे, धडपडीचे व धडाडीचे बंदिवासात स्वतःवर झालेल्या अन्यायांचे (लोकांच्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन त्यांना आपल्याला मिळालेली वागणूक अन्यायकारक होती हे भासविण्याच्या मागील दांभिकता कुरुंदकरांनी व्यवस्थितपणे उघड केलीय.) गहिवरून वर्णन करून अटक झाल्यापासून ते फाशी जाईपर्यंत नथूरामने केलेल्या करारी - त्यात करारीपणापेक्षा अधिक उदात्त वा नैतिक काही नव्हते हेही कुरुंदकरांनी स्पष्ट केले आहे - वर्तनाचे भावुक वर्णन करून, त्यांनी हा परिणाम साधण्याचा प्रयत्न केला. तो यशस्वी व्हावा यावरून मराठी बुद्धिजीवी वर्गाच्या भावविवश मानसावर विदारक प्रकाश पडतो.

खून हे एक आदरणीय कृत्य कधी ठरते? खुनी इसमाने ते वैयक्तिक स्वार्थापोटी केलेले नाही एवढी गोष्ट पुरेशी आहे

काय? त्यामागील विचार योग्य असेल, ध्येय उदात्त असेल, तर? पण विचाराची योग्यता, ध्येयाची उदात्तता सर्वांकरिता त्याच सारख्या कसोट्यांवर ठरत नाहीत. कुरुंदकर अशी भूमिका घेतात : 'हत्येचे नैतिक समर्थन करण्यासाठी दोन महत्त्वाच्या बाबी सिद्ध कराव्या लागतात. पहिली बाब म्हणजे विरोधकांचे सामर्थ्य पाशवी होते हे सिद्ध करावे लागते. फौजा, तोफा, बंदुका, गोळ्या व अत्याचार या जोरावर जे जनतेला दडपू इच्छितात त्यांचा प्रतिकार जनतेच्या वतीने स्वतःला जनतेचा स्वयंभू प्रतिनिधी मानून एक जण उठून करतो, कायदा स्वतःच्या हातात घेतो, आणि अत्याचाराच्या शस्त्राने विनाश करून स्वतः धन्यतेने फासावर लटकतो, तिथे हत्या करणाराही हुतात्मा होतो. अशा वेळी हत्या करणारा जनतेचा आवाज असतो. आणि वध्य जनतेचा शत्रू असतो. नथूराम 'भारतीय जनतेचा आवाज' नव्हता म्हणून कुरुंदकर नथूराम हुतात्मा होऊ शकत नाही असे ठरवितात.

ही भूमिका तर्कशुद्ध नाही. गांधींची शक्ती पाशवी नव्हती, पण ती छाती दडपून टाकण्याइतकी प्रचंड होती. ही देशविघातक शक्ती आहे अशी प्रामाणिक समजूत होऊ शकते.

पाशवी आणि अपाशवी हा भेद अर्थपूर्ण नाही; शक्ती एका व्यक्तीच्या वा गटाच्या हाती किती एकवटलेली आहे ते महत्त्वाचे आहे. खरोखरच एका माणसाला नाहीसे केल्याने जर सबंध इतिहासाला वेगळे वळण लावता येत असले तर त्याची शक्ती अ-पाशवी आहे म्हणून त्यास मारू नये हे सयुक्तिक ठरणार नाही. गांधींना मारल्याने देश वेगळ्या मार्गाने जाईल हा नथूरामचा अंदाज चुकला, एवढ्यासाठी त्याचे हौतात्म्य हिरावले जाऊ शकत नाही.

खरा भेद वेगळाच आहे. हिंसा इष्ट की अनिष्ट याविषयी मत काहीही असू शकेल, पण एका प्रकारची हिंसा सन्माननीय असू शकते याबद्दल खुद्द गांधींचा मतभेद नव्हता. गांधींनी भ्याडाची हिंसा व शूराची हिंसा यात फरक केला होता, व तोच प्रस्तुत आहे. सशस्त्र क्रांतिकारकांनी शत्रूविरुद्ध युद्ध पुकारलेले असते, आपल्या कृतीची दिशा स्पष्ट केलेली असते. कट करून खून करणारी मंडळी असे युद्ध पुकारून हिंसा करीत नाहीत. बेसावध क्षणी दुसऱ्याचा बळी घेतात. ही भ्याडांची व म्हणून गर्हणीय हिंसा झाली. नथूराम व त्याचे सहकारी 'आम्ही गांधी व गांधी ज्या विचारधारेचे व संघटनेचे प्रतीक आहेत त्यांच्याविरुद्ध शस्त्र हाती घेतले आहे' असे जाहीर केले असते आणि युद्धमान परिस्थिती निर्माण करून मग गांधींचा बळी घेतला असता तर ती सन्माननीय हिंसा झाली असती. मग, ज्यांच्या वतीने त्यांनी हे युद्ध पुकारले असते ते अल्पसंख्य आहेत म्हणून फरक पडला नसता.

मुद्दा असा की, गांधींच्या कार्याबद्दल नथूरामचे विश्लेषण मान्य करणाऱ्यांनीही नथूराम व त्याचे सहकारी हे भ्याड हिंसेचे उपासक व म्हणून अनादरास पात्र असलेले खुनी आहेत हे ओळखणे जरूर आहे. हा नीरक्षीरविवेक नथूरामच्या समविचारी लोकांनी आजपावेतो दाखविलेला नाही आणि म्हणून त्यांच्या संघटना या कृतीच्या रणांगणातून पळ काढणाऱ्या संघटनाच आजवर ठरलेल्या आहेत. पाकिस्तान निर्माण होणार हे स्पष्ट झाले तेव्हा शस्त्र हाती घेऊन त्याविरुद्ध लढण्यास हिंदु महासभाही उभी राहिली नाही, ना राष्ट्रीय स्वयसेवक संघ सन्माननीय हिंसा आणि भ्याडांची हिंसा यात भेद न करता आल्याने या संघटना कधी वीरांच्या संघटना बनू शकल्या नाहीत.

गांधींना पूज्य मानणाऱ्या आम जनतेच्या नजरेतच केवळ नव्हे तर त्याच्या विचाराच्या मंडळीतही नथूराम हुतात्मा गणला जाऊ शकत नाही. सूडबुद्धीपायी अविचारी कृत्य करणारा तो विकारी माणूस होता. विकारी माणसे पुष्कळदा आपल्या विकारावर दृढ राहतात तसा नथूरामही राहिला, व आपण जे कृत्य केले त्याबद्दल त्याने फेरविचार केला नाही. सर्वांचे लक्ष आपल्यावर केंद्रित करून घेण्यात यशस्वी होणारा माणूस आपल्या चुकीच्या कृत्याशी आत्मगौरवाच्या भावनेने समरस होतो, व त्या प्रकाशाच्या झोतामुळे मृत्यूही त्याला आकर्षक वाटतो.

नथूरामची गोष्ट अशीच होती. गोपाळ गोडसे यांनी रंगविला तसा तो खरोखर असता तर त्याने खूनच केला नसता. ही विसंगती गोपाळ गोडसे यांच्या लक्षात येईल अशी अपेक्षा बाळगणे हा त्यांच्यावर अन्याय होईल.राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे सरसंघचालक श्री. मा. स. गोळवलकर यांनी गांधीजन्मशताब्दीच्या वर्षी गांधींना प्रातःस्मरणीय म्हटले यामागे सच्चे मनपरिवर्तन नव्हते; तर, गांधीचे शत्रुत्व करणारी संघटना जनमानसात रुजणार नाही हे त्यांनी ओळखले आणि म्हणून बदलत्या राजकीय वातावरणात हिंदुत्ववादी पक्षाच्या वाढीचा मार्ग निष्कंटक करण्याच्या हेतूने शताब्दीच्या वाहत्या गंगेत आपणही आहोत हे जाहीर करून टाकले, हा धोरणीपणा कुरुंदकरांनी गोळवलकरांच्या नीट घशात घातला आहे. गांधींचे पुनर्मूल्पमापन करावयाचे म्हणजे आपण नादान, अंधद्वेष्टे व राष्ट्रहितविरोधी वर्तन केले याची कबुलायत देणे होय आणि तशी कबुलायत द्यावयाची गोळवलकरांची कल्पना नाही.

या संदर्भात गांधींचे राजकारण मुस्लिमधार्जिणे होते असे म्हणणे किती मूर्खपणाचे आहे तेही कुरुंदकरांनी व्यवस्थितरीत्या स्पष्ट केले आहे. कुरुंदकर म्हणतात, 'सर्व मुस्लिम राजकारण विभक्त मतदारसंघाच्या मागणीभोवती गुरफटलेले राजकारण आहे. विभक्त मतदारसंघामुळे लीग बळकट झाली, ती देश विभाजनाची मागणी करू शकली, व या मागणीला तडीला नेऊ शकली.' या विभक्त मतदारसंघांना (व मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणाहून जास्त जागा देण्यास) गोखले - टिळक यांनी मान्यता दिली होती. 'लखनौ करार' हा जीना टिळक करार म्हणून ओळखला जातो. कुरुंदकर लिहितात, ज्याच्या काळात मुसलमानांना अधिक काही देणारा एकही करार नाही तो गांधी मृत्यूनंतर वीस वर्षे "मुसलमानधार्जिणा" म्हणून बदनाम असावा; आणि ज्यांनी विभक्त मतदारसंघ दिले, मान्य केले ती माणसे (गोखले, टिळक इ.) अत्यंत धूर्त, मुत्सद्दी म्हणून गाजलेली असावीत, यासारखा राजकीय चिकित्सकपणाचा दुसरा दिवाळखोरपणा असणार नाही. 'गांधींच्या अहिंसानिष्ठेची टिंगलटवाळी करणे हा एक हिंदुत्ववाद्यांचा आवडता छंद होता, आजही आहे. संघटित परकीय सत्तेविरुद्ध जनतेची चळवळ गुप्तपणे करता येत नाही व म्हणून ती हिंसक मार्गांनी करता येत नाही, हा एक चांगला मुद्दा कुरुंदकरांनी उपस्थित केला आहे. त्याचा त्यांनी अधिक ऊहापोह करायला हवा होता. पण, कुरुंदकर पुढे म्हणतात त्याप्रमाणे, खरा मुद्दा गांधींच्या अहिंसानिष्ठेचा नाही, तो या हिसानिष्ठांच्या वाचाळपणाचा आहे. हिंसेचा उदोउदो करणारी ही सर्व मंडळी (वैयक्तिक अपवाद सोडता) १९२० नंतरच्या काळात स्वातंत्र्यलढ्यापासून दूरच होती! कुरुंदकर म्हणतात, 'अहिंसेने असो की हिंसेने असो, जे इंग्रजांच्या विरुद्ध लढत होते त्यांचे नेते गांधीजीच होते. जे इंग्रजांच्या विरुद्ध लढत नव्हते, जे जनतेची चळवळही करीत नव्हते... फक्त हिंसेच्या आवश्यकतेवर व्याख्याने देत होते, ही क्रियारहित माणसे फक्त गांधीजींची विरोधक होती.' (अनेकांना

देशभक्तीची स्फूर्ती देणारे सावरकर हे याचे अग्रगण्य उदाहरण.) हे विदारक सत्य गोळवलकरांना मान्य आहे काय, असा सवाल कुरुंदकर विचारतात.

याहीपुढे जाऊन, कुरुंदकर वर्मावर बोट ठेवतात : 'हिंदुस्थानातील हिंदू हिंदुत्ववाद्यांच्या मागे का नाहीत'?... तर, 'हिंदुत्ववादाला हिंदू धर्माचे प्रेम आहे, हा धर्म ज्या जनतेने सहस्रावधी वर्षे प्रेमाने व निष्ठेने जतन केला त्या जनतेचे प्रेम नाही!' म्हणून हिंदुत्ववाद्यांचे सारे राजकारण १९२० नंतरच्या काळात केवळ मुस्लिमविरोधी बनले होते. भारतातील सर्वसामान्य बहुजनसमाजात असा आंधळा मुस्लिमद्वेष आढळू नये, फक्त समाजाच्या वरिष्ठ थरात, उच्चवर्णियांतच त्याला जो काय थोडा मिळाला तो पाठिंबा मिळावा, या ऐतिहासिक वास्तवाचेही विश्लेषण करण्यासारखे आहे. हिंदुस्थानातील ऐतिहासिक काळापासून चालत आलेला हिंदू-मुस्लिम संघर्ष हा मूलतः दोन पारंपरिक सत्ताधारी गटांतील संघर्ष होता, व या दोन्ही गटांना आपापल्या जमातीतील बहुजन समाजांबद्दल सारखीच उपेक्षा होती. मुस्लिम लीग व हिंदू महासभा यांच्यात फार साम्य आढळते साम्य आढळते ही योगायोगाची गोष्ट नाही.

गोळवलकरांनी चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करणारी मध्यंतरी जी एक कुप्रसिद्ध मुलाखत दिली होती तिची चिकित्सा कुरुंदकरांनी केली आहे. वर्णव्यवस्थेचा पुरस्कार वर्णव्यवस्थेच्या पोटी नसून 'ग्रामीण भागातील धार्मिक माणूस आपल्या ध्वजाखाली गोळा करण्यासाठी आहे' असे कुरूंदकर म्हणतात. पण आजचा खेड्डुत धार्मिक असला तरी जातपातींच्या उतरंडीतील आपले हीन स्थान पत्करण्यास अजिबात तयार नाही. तेव्हा चातुर्वर्ण्याचा पुरस्कार या दृष्टीने आपणास महागात पडणार हे, गोळवलकर धोरणी असते तर त्यांना कळले असते. पण चातुर्वर्ण्याच्या प्रकरणात गोळवलकरांनी निर्बुद्धपणाची कमाल केली आणि ती प्रामाणिकपणे केली. (१९७१च्या लोकसभेच्या निवडणुकांमध्ये काही प्रमाणात त्याची किंमतही जनसंघास चुकवावी लागली.)

मुस्लिम जातीयवादी राजकारणावर या संग्रहात तीन लेख आहेत. मुस्लिम जातीयवादी राजकारणासंबंधीची कुरुंदकरांची मते प्रसिद्ध आहेत. कुरुंदकरांची भूमिका थोडक्यात अशी : 'मुसलमानांचा प्रश्न गौणत्वाने अल्पसंख्याकांचा प्रश्न आहे, प्राधान्याने... संख्येने अल्प असलेल्या जेत्यांच्या वरिष्ठ अहंतांचे ते राजकारण आहे. आपण जेते असल्याची, एकमेव वरिष्ठ संस्कृतीचे पाईक असल्याची प्रखर जाणीव भारतीय मुसलमानांमध्ये आहे... परंपरेने विशेषाधिकार उपभोगीत आलेल्या मुस्लिम समाजाला आपण गमावले काय याची अधिक चिता आहे. समान नागरिकत्वावर मुस्लिम राजकारणाला संतोष नाही... अहंकाराला उत्तर चोंभाळणे नसून निर्भय व कठोर चिकित्सा हेच असू शकते.' कुरुंदकरांचा आरोप असा की अशी कठोर चिकित्सा करण्याऐवजी काँग्रेसी नेत्यांनी तडजोडीचे राजकारण केले. 'औदार्यपूर्वक विश्वास संपादन करणे आणि हित समजावून देणे हाच एकमेव मार्ग आहे ही समजूत चुकीची आहे.'

कुरुंदकरांच्या म्हणण्यात तथ्य आहे. काँग्रेसपासून फटकून वेगळे का राहिले पाहिजे याची कारणे देताना सर सय्यद अहमद यांनी आजवर राज्य गाजविलेले मुसलमान हिंदूंच्या बहुसंख्याक राजवटीखाली गौणस्थान पत्करण्याची

कल्पनाही करू शकत वेगवेगळे व राखीव प्रतिनिधित्व मिळावे अशीच नेहमी राहिली.नाहीत, असे एक कारण दिले आहे.

'जागर' या आपल्या आधीच्या लेखसंग्रहात कुरुंदकरांनीच लढ्याच्या काळात साथ देत असल्याने परंपरावादी मुस्लिमांशी तडजोड काहीशी स्वाभाविक व अपरिहार्य होती असे म्हटले आहे. ही तडजोड न करता या मुस्लिम गटास दूर लोटावयास हवे होते असे आज १९७० साली म्हणणे सोपे आहे. १९२० साली ही गोष्ट कठीण होती. खान अब्दुल गफारखान व त्यांचे पठाण याच परंपरावादी मुसलमानापैकी एक होते हे विसरून चालणार नाही.

कुरुंदकरांच्या विवेचनातील कच्चेपण दोन प्रकारचे आहे. (१) काँग्रेसचे प्रांतीय पातळीवरील राजकारण अधिक जवळून बघितल्याशिवाय ठिकठिकाणचा मुस्लिम बहुजनसमाज काँग्रेसच्या राजकारणापासून का व कसा दूर गेला ते स्पष्ट होणार नाही. उदाहरणार्थ, एक बंगालच्या राजकारणाचाही जवळून अभ्यास करता असे आढळते की काँग्रेसी नेत्यांच्या "उदारमतवादी", मुसलमांनाच्या कोणत्याही मागण्या मान्य करीत जाण्याच्या तडजोडीवादी भूमिकेतून मुसलमान अधिकच शेफारत गेले हे पूर्ण सत्य नव्हे. उलट, दीर्घ काळ मुस्लिम बहुजनसमाजाच्या हितसंबंधांविषयी, त्यांच्या भावनांसंबंधी कमालीचा तिरस्कार, त्यांना आंधळा विरोध यातून तेथील सुशिक्षित मध्यमवर्गीय मुस्लिम नेतृत्व व बहुजनसमाज काँग्रेसपासून दूर गेला. बंगालची फाळणी रद्द करवून घेतली हा हिंदूंच्या राजकारणाचा विजय व आपला पराभव असे तेथील मुसलमानांना वाटलेले आहे. म्हणजे, वंगभंगाच्या चळवळीचे पुनर्मूल्यांकन करण्याची गरज आहे. तीच गोष्ट काही प्रमाणात १९२० नंतरच्या असहकार, बहिष्कार आंदोलनांबद्दलची आहे. सांगण्याचा मतलब असा की, काँग्रेसच्या राजकारणाची रूढ मीमांसा संपूर्णपणे मान्य करण्याची चूक यापुढे आपण करता कामा नये. ब्रिटिशांच्या आगमनानंतरच्या इतिहासाचे स्वतंत्रपणे तपशीलवार व सूक्ष्म परिशीलन केले पाहिजे

(२) असे परिशीलन केले तर कदाचित आपणास असेही आढळेल की राष्ट्राच्या बांधणीविषयीची त्या वेळची समजच काहीशी वेगळी होती. हिंदुस्थान हे विविध धार्मिक जमाती, (व हिंदूमधील जाती-उपजाती) यांचे, म्हणजे वेगवेगळ्या गटांचे मिळून बनलेले आहे अशी बहुतेक सर्वांचीच धारणा होती. व्यक्ती हे मूलभूत एकक नाही, तर जात, धार्मिक जमात या स्वरूपाचा गट हे मूलभूत एकक होय असा विचार होता. आणि म्हणून विविध जमातींची व जातींची मागणी आपणास ती त्या काळात - गांधीयुगापूर्वी - तरी अस्वाभाविक वाटली नाही. मुसलमानांना विशेष वागणूक दिली पाहिजे, म्हणजे लोकसंख्येतील त्यांच्या प्रमाणापेक्षा त्यांना काही जास्त जागा देणे उचित आहे, याविषयीही फारसा मतभेद नव्हता; भूतकाळ आजच्याइतका त्यावेळी भूतकाळात जमा झाला नव्हता.

ब्रिटिश राजवटीशी हातमिळवणी करून राजकारण करावे की काँग्रेसप्रमाणे ब्रिटिश राजवटीच्या विरोधी संघटन बांधून- काँग्रेस अंतर्गत की वेगळे हा प्रश्न निराळा व स्वतंत्र होता - करावे यावरून खरा झगडा झाला. याही बाबतीत असे दिसते की, १९०५-०६ सालची मुस्लिम लीग सर सय्यद अहमद खान यांच्या वैचारिक प्रभावाखालील, खानदानी सरंजामदारांच्या हातातली संघटना होती तर पुढे १९१५-१६ नंतरची लीग मध्यमवर्गीय, शिक्षित पुढाऱ्यांच्या हातातील व

ब्रिटिशविरोधी वळणाची होती. आणि या नव्या लीगचा काँग्रेसशी जुळवून घेऊन संयुक्तपणे ब्रिटिशविरोधी राजकारण करण्याकडे कल होता. असे असतानाही 'लखनौ करारा'च्या टप्प्यानंतर सामंजस्याच्या दिशेने प्रगती न होता अंतर वाढत का गेले?

पहिल्या महायुद्धानंतरच्या बदललेल्या जागतिक वातावरणात लोकशाही, समाजवाद या विचारधारांनी राष्ट्रबांधणीच्या रूढ कल्पनेतच परिवर्तन घडवून आणले. त्यात गांधींच्या राजकारणाने जातपात, धर्मभेद यांच्या तटबंदींना न जुमानण्याचा पवित्रा घेतला. गांधींचे अखिल भारतीय पातळीवरील नेतृत्व आणि प्रांतीय नेतृत्व यांत बहुतेक प्रांतांमध्ये औदार्य, समज, इ. बाबतींत खूप मोठी दरी होती आणि त्यामुळे जेत्यांच्या विशेषाधिकारसंपन्न भूमिकेतल्या राजकारणातून समान नागरिकत्वाच्या राजकारणावर मुसलमानांना आणण्यासाठी जो प्रगल्भ समजूत व औदार्य यांचा पूल टाकला जावयास हवा होता तो टाकला गेला नाही. हा पूल बांधावयाचा म्हणजे जास्त सवलती, विशेष प्रमाणात जागा, राखीव नोकऱ्या देऊ करावयाच्या अशी समजूत काँग्रेसी नेत्यांनी करून घेतली व ती अंगाशी आली. पण लोकशाही व समाजवाद यांचे वातावरण व गांधींची बहुजनकल्याणाची भूमिका यांच्या संदर्भात बहुजनसमाजहिताचे सच्चे व कडवे राजकारण करूनच हे साधता आले असते. या संदर्भात हे लक्षात घेण्यासारखे आहे की १९०५-०६ पासून ते थेट १९२५-२६ पर्यंत मुस्लिम लीगच्या राजकारणास मुस्लिम बहुजनसमाजात फारसा पाठिंबा नव्हता.

तात्पर्य असे की, हिंदुस्थानच्या वेगवेगळ्या प्रांतांमधून, तेथील विशिष्ट समाजरचनेमुळे व ऐतिहासिक पार्श्वभूमीमुळे तेथील हिंदू समाज व मुसलमान समाज यांचे आर्थिक, सामाजिक व राजकीय हितसंबंध परस्परविरोधी होते, काँग्रेस सामान्यतः हिंदूंच्या हितसंबंधांचे संरक्षण करणारी होती व म्हणून बऱ्याच वेळा अदूरदर्शी स्वार्थ प्रभावी ठरून मुस्लिम बहुजनसमाज व मध्यमवर्ग दूर लोटला गेला, असे घडले असण्याची शक्यता तपासून पाहिली पाहिजे.

जेत्यांची अहंता व त्यापोटी रुजलेल्या अवाजवी आकांक्षा, ब्रिटिश प्रशासनयंत्रणेचा काँग्रेसविरोधी पवित्रा, ब्रिटिश राज्यकर्त्यांची 'फोडा व झोडा' ही नीती, मुसलमानांमधील परंपरावादी धर्माचा चिवट प्रभाव इत्यादी घटक तरीही महत्त्वाचे राहतातच. आणि म्हणून अखेरीला फाळणी होणे ही एक विशिष्ट ऐतिहासिक विकासक्रमातली अटळ वाटचाल होती असेही म्हणता येते.

विस्ताराने हा सारा प्रपंच करण्याची दोन कारणे आहेत. एक, कुरुंदकरांनी 'निर्भय, कठोर चिकित्से'चा मुद्दा फाजील ताणला आहे हे लक्षात यावे. दुसरी गोष्ट, आज या प्रश्नाला हात घालताना काय सावधगिरी बाळगली पाहिजे तेही कळावे.

बहुसंख्य मुसलमान सर्वसामान्य माणसांप्रमाणे त्यांच्या दैनंदिन काळज्यांमध्ये व्यग्र असणार. कुरुंदकरच 'श्री. गोळवलकर गुरुजी आणि महात्मा गांधी' या आपल्या लेखात म्हणतात, 'जनतेचे मन नेहमीच परंपरावादी असते. पण या परंपरावादी मनाला व्यावहारिक वस्तुस्थितीचे प्रश्न त्रस्त करीत असतात. गांधींचे नेतृत्व परंपराप्रिय जनतेने उचलून धरले कारण गांधींनी राजकीय स्वातंत्र्याची चळवळ निर्माण केली. तिच्या पोटात हिंदूंच्या सर्व सांस्कृतिक व आर्थिक

उद्धाराच्या आकांक्षा सामावलेल्या होत्या. मुसलमान बहुजनसमाज काही वेगळा नसणार. आजच्या हिंदूंवर हिंदुत्ववाद्यांची पकड नाही पण मुसलमानांवर मुस्लिम जातीयवाद्यांची आहे.

याचा एक अर्थ, कुरुंदकरांच्या वरील निवेदनाच्या अनुषंगाने, असा लागतो की, अद्यापपर्यंत मुसलमान बहुजनसमाजाच्या आकांक्षांना सामावून घेण्यात कोणत्याही चळवळीस यश आलेले नाही किंवा त्यात मुस्लिम जातीयवादी राजकारण यशस्वी झाले आहे. पुढे जाऊन त्याचा अर्थ असा की, 'कठोर चिकित्सा', संविधानाच्या जोरावर सुधारकी कायदे मंजूर करून घेणे, हे मुस्लिम जातीयवाद्यांचा प्रभाव मोडून काढण्याचे प्रभावी मार्ग ठरू शकत नाहीत (ते चोखाळले पाहिजेत हे मान्य करूनही). मुस्लिम बहुजनसमाजाला त्रस्त करणारे "व्यावहारिक वस्तुस्थितीचे प्रश्न" अधिक परिणामकारकरीत्या हाताळणारा पक्ष पुढे यावयास पाहिजे. पण अशा पक्षावर मुस्लिमधार्जिणेपणाचा आरोप चटकन केला जाईल! (जसा तो गांधींवर होत आला.)

मुस्लिम जातीयवादी नेतृत्वाचा प्रभाव अंधश्रद्ध मुसलमान समाजावर आहे यात शंका नाही. पण बहुसंख्य मुसलमानांचे दैनंदिन जीवन धर्मशास्त्राच्या काटेकोर कसोटीवर धर्मबाह्य ठरेल अशा पद्धतीने चालले आहे हे कुरुंदकरांनीच स्पष्ट केले आहे. ही विसंगती, परिस्थितीचे हे ताण यांचा लाभ आपण आज उठवू शकत नाही, तो कसा उठविता येईल यावर लक्ष अधिक केंद्रित करावयास हवे. त्याऐवजी इस्लाम धर्माचे स्वरूप व तो कायद्याने सुधारण्याची गरज यांवर अतिरेकी प्रमाणात लक्ष केंद्रित केले जात आहे. परिस्थितीतील ताण, वर उल्लेखिलेली विसंगती कशी वाढेल, म्हणजे एका अगदी वेगळ्या घाटाच्या जीवनप्रवाहात मुस्लिम बहुजनसमाज कसा खेचला जाईल, जातीयवादी नेतृत्वाची विचारसरणी व व्यवहार यांतील अंतर इतके कसे वाढेल की ज्यामुळे धार्मिक नेत्यांशी असलेली नाळ तुटेल याचा आज वास्तविक विचार व्हायला पाहिजे.

कठोर चिकित्सेचे कार्य कुरूंदकरांनी पुष्कळ केले आहे. आता मुस्लिम बहुजनसमाजाच्या आकांक्षांच्या पूर्ततेच्या राजकारणाच्या रूपरेषा स्पष्ट करण्याचे काम त्यांनी हाती घेण्याची वेळ आली आहे.